20140804135717180 8

तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अंतर्गत कार्यरत शासकीय तथा अनुदानित अभियांत्रिकी तथा औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालये तथा तंत्रनिकेतने व [illegible] संस्थांमधील शिक्षकांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या शिफारसीनुरूप लागू करावयाची करियर ॲडव्हान्समेंट योजना

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्रशिक्षण विभाग,
शासन निर्णय क्र.एटीयु २०००/(७४/२०००)/तांशि-५,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक : ८ नोव्हेंबर,२००४.

संदर्भ:- १) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.आरपीएस २११८/७७/तांशि-६, दि.१८.१२.१९९९.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.एटिव्ही २०००/७४/तांशि-५, दि.१३.३.२००२.
३) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.आरपीएस १२२०/१/तांशि-५, दि.२७.२.२००३.
४) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.एटीयु २०००/(७४/२०००)/तांशि-५, दि.११.५.२००४.
५) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.एनजीसी १२९८/(४६११)/ विशि-४, दि.११.१२.१९९९.
६) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.एनजीसी १२००/७३३९६/ (१५/२०००)/विशि-४, दि.१३ जून, १९९९.
७) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.एससीपी १००२/(१०१/०२)/मशि-२, दि.२६.८.२००२.
८) अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे क्र.एफडी/पीएलएससी/क्लॅरिफ/२००२/१, दि.३.१.२००३ चे पत्र.
९) अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे क्र.एफडी/पीएसएससी/क्लॅरिफ/२००३/१, दि.३०.१.२००३ चे पत्र.
१०) अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे क्र.एफडी/पीएसएससी/क्लॅरिफ/२००३/१, दि.११.९.२००३ चे पत्र.
११) अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे क्र.एफडी/पीएसएससी/क्लॅरिफ/२००३/१, दि.१७.१२.२००३ चे पत्र.
१२) विद्यापीठ अनुदान आयोगाचे क्र.एफ-२-१६-२००२(पीएस), दि.१७.१०.२००२ चे पत्र.
१३) शासनाचे क्र.युजीसी २००३/४०२०/(१५)/विशि-४, दि.२ मे,२००३ चे पत्र.



प्रस्तावना:- उपरोक्त संदर्भ क्र.-१ अन्वये अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या सुधारित वेतनश्रेण्या अभियांत्रिकी महाविद्यालयातील शिक्षकीय पदांना लागू करून संदर्भ-२ मधील शासन निर्णयान्वये या पदांना करियर ॲडव्हान्समेंट योजना लागू करण्यात आली आहे. याचप्रमाणे उपरोक्त संदर्भ- ३ मधील शासन निर्णयान्वये तंत्रनिकेतनातील शिक्षकीय पदांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या सुधारित वेतनश्रेण्या व करियर ॲडव्हान्समेंट योजना लागू करण्यात आली आहे. सदर शासन निर्णय लागू करण्याची कार्यवाही सुरू असताना उपरोक्त संदर्भ-८ ते ११ मधील पत्रान्वये अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेकडून या प्रकरणी अनेक मुद्यांवर स्पष्टीकरण व काही सुधारणा प्राप्त झाल्या असल्याने तदनुषंगाने राज्य शासनाने लागू केलेल्या करियर ॲडव्हान्समेंट योजनेच्या संदर्भात खालीलप्रमाणे बदल करण्यात येत आहे.

१८२

शासन निर्णय:- उपरोक्त संदर्भ-१० मधील पत्रात नमूद केल्याप्रमाणे तंत्रशिक्षण संस्थांत शिक्षक पदांना करियर ॲडव्हान्समेंट योजना लागू करताना समान प्रकरणी विद्यापीठ अनुदान आयोग निकष तथा कायदे लागू करावयाचे असल्याने शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये व तंत्रनिकेतन यातील शिक्षकीय पदांना आश्वासित प्रगती योजनेंतर्गत देय ठरणारे लाभ उच्च शिक्षण संचालयांतर्गत कार्यरत इतर महाविद्यालयातील शिक्षकीय पदाप्रमाणेच शासन स्तरावर लागू करण्यात येतील व सदर योजनेचे लाभ दि.२७.७.१९९८ पासून देय ठरविण्यात येत आहेत.

शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयातील सहाय्यक प्राध्यापक व प्राध्यापक या पदांना करियर ॲडव्हान्समेंट योजना लागू करण्यासाठी उपरोक्त संदर्भ-४ अन्वये गठीत करण्यात आलेली समिती रद्द करून पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

१) प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग — अध्यक्ष
२) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, — सदस्य
३) विभागीय अधिकारी, पश्चिम विभागीय परिषद, अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, मुंबई/ त्यांचे प्रतिनिधी — सदस्य
४) संबंधित विद्यापीठांच्या कुलगुरूंनी नामानर्देशित केलेली व्यक्ती (कमीत कमी प्राध्यापक दर्जा) — सदस्य
५) संबंधित शाखेतील तज्ञ — सदस्य(३)
६) संबंधित विभागाचे सहसंचालक — सदस्य
७) उपसचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई — सदस्य सचिव

शासन स्तरावर उपरोक्त समितीची बैठक दरवर्षीच्या जानेवारी व जुलै महिन्याच्या दुसऱ्या/तिसऱ्या आठवड्यात घेण्यात येईल व करियर ॲडव्हान्समेंट योजनेचे निकष उपरोक्त संदर्भ-११ मध्ये नमूद केलेल्या अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, न्यु दिल्ली यांच्या दि.१७.१२.२००३ मधील पत्रासोबत जोडलेल्या प्रपत्र-१ मध्ये नमूद केल्याप्रमाणे निर्धारीत करण्यात येत आहेत. सदर प्रकरणी पात्र उमेदवारांनी आवश्यकतेनुरूप आपले शोध निबंध/पुस्तके निवड समितीवरील तज्ञ व्यक्तींकडे समितीच्या बैठकीच्या दिनांकाच्या कमीत कमी एक महिना पूर्वी आवश्यक छाननीसाठी सादर करावेत, जेणेकरून समितीवरील तज्ञ व्यक्तींना निवड समितीच्या बैठकीत उमेदवारासंबंधीचे आपले अभिप्राय सादर करणे शक्य होईल.

शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये तथा तंत्रनिकेतनातील अधिव्याख्यात्यांसाठी खालीलप्रमाणे संचालनालय स्तरावर निवड समिती गठीत करण्यात येत आहे.

१) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, — अध्यक्ष
२) उपसचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई — शासनाचे प्रतिनिधी
३) विभागीय अधिकारी, पश्चिम विभागीय परिषद, अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, मुंबई/ त्यांचे प्रतिनिधी — सदस्य
४) संबंधित शाखेतील तज्ञ — सदस्य(३)
५) संबंधित विभागाचे सहसंचालक — सदस्य
६) संबंधित महाविद्यालय/तंत्रनिकेतनांचे प्राचार्य — सदस्य

सदर समितीने उपरोक्त संदर्भ- ११ मधिल पत्र व संदर्भ- ३ मधील शासन निर्णयानुसार अनुक्रमे अभियांत्रिकी महाविद्यालये व तंत्रनिकेतनातील अधिव्याख्याता पदावरील पात्र उमेदवारांच्या शिफारसी दरवर्षी जानेवारी व जून महिन्यात शासनास सादर कराव्यात. सदर शिफारसीनुरूप संबंधित पात्र उमेदवारांना करियर ॲडव्हान्समेंट योजनेचे लाभ लागू करण्यात येतील.

करियर ॲडव्हान्समेंट योजना लागू करण्यासाठी अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या क्यु.आय.पी. योजने अंतर्गत राबविण्यात येणारे, विद्यापीठ अनुदान आयोगामार्फत व आय.एस.टी.ई. द्वारा तथा शासन मान्य विद्यापीठे व शिक्षण संस्थामार्फत राबविण्यात येणारे प्रगत अभ्यासक्रम (Advance course) ग्राह्य धरण्यात येतील, तसेच सदर संस्थांमार्फत राबविण्यात येणारा उजळणी वर्गाचा किमान कालावधी जरी भिन्न असला तरीही वेळोवेळी केलेल्या उजळणी वर्गाचा एकूण कालावधी मात्र संबंधित पदासाठी निर्धारित केल्याप्रमाणेच राहील. सदर उजळणी वर्ग पूर्ण करण्यास करियर ॲडव्हान्समेंट योजनेच्या इतर अटी पूर्ण करणाऱ्या शिक्षकांना दि.३१ डिसेंबर,२००४ पर्यंत सलवत देण्यात येत आहे. तसेच दि.२२ ऑक्टोबर,२००२ पासून तीन वर्षाच्या आत सेवानिवृत्त होणाऱ्या शिक्षकांना करियर ॲडव्हान्समेंट योजना लागू करण्यास्तव उजळणी वर्ग पूर्ण करण्याची अट लागू राहणार नाही.

अभियांत्रिकी महाविद्यालये व तंत्रनिकेतनात कार्यरत असलेल्या अतांत्रिक विषयातील (English, Maths, Physics, Chemistry etc.) शिक्षकांना करियर ॲडव्हान्समेंट योजनेचे लाभ उपरोक्त संदर्भ-५ मधील अटी व शर्तीनुसार देय होतील.

अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेचे यासंदर्भात जे आदेश राज्य शासनाला वेळोवेळी प्राप्त होतील, त्यानुसार राज्य शासन वेळोवेळी जे आदेश काढेल त्यांची अंमलबजावणी न चुकता करणे आवश्यक असल्याने सदर शासन निर्णयाची त्वरित अंमलबजावणी करून यापूर्वी संचालनालय स्तरावर दि.१ जानेवारी,१९९६ नंतर ज्या शिक्षकांना करियर ॲडव्हान्समेंट योजनेचे लाभ देण्यात आले आहेत, त्या सर्व प्रकरणांचा पुनर्विचार करून आवश्यकतेनुसार सदर प्रकरण शासनाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात यावे.

सदर शासन निर्णयानुसार करियर ॲडव्हान्समेंट योजनेचे संदर्भात निवड समितीची प्रथम बैठक जानेवारी,२००५ च्या तिसऱ्या आठवडयात घेण्यात येईल. तंत्रशिक्षण संचालनालयाने यासंदर्भात आवश्यक प्रस्ताव डिसेंबर,२००४ अखेरपर्यंत शासनास सादर करावे.

सदर शासन निर्णय, तंत्रशिक्षण संचालनालयांतर्गत कार्यरत अनुदानित संस्थांना लागू करून त्यासंदर्भात अंतिम कार्यवाही संचालनालय स्तरावर करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( मनीषा शिंदे )
शासनाच्या उपसचिव.

प्रति,

संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
(सदर शासन निर्णय, तंत्रशिक्षण संचालनालयांतर्गत कार्यरत सर्व संस्थांना कळविण्याची त्यांनी व्यवस्था करावी.)
सहसंचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालय, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
कार्यासन क्र.तांशि-१, तांशि-२, तांशि-३, तांशि-४, तांशि-६, उच्च व तंत्रशिक्षण विभाग,
निवड नस्ती/तांशि-५.

१८४